**कोयना भूकंप पुनर्वसन निधी समिती अंतर्गत कराड उत्तर तालुक्यातील विकास कामांना दिलेल्या प्रशासकीय मान्यतेनुसार निधी वितरीत करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन)**
शासन निर्णय क्रमांक-कोभूपु-३१२४/प्र.क्र. ९२/र-५
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक:- २५ मार्च, २०२५

**वाचा:-**

१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:-कोभूपु-१५२३/प्र.क्र.०१/का.५ (नासंस), दि. १३/०६/२०१८.
२. शासन निर्णय, महसूल व वन विभाग (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन), क्रमांक-कोभूपु-३१२३/प्र. क्र. ११/र-५, दि. ०६/०२/२०२४.
३. शासन निर्णय, महसूल व वन विभाग (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन), क्रमांक-कोभूपु-३१२३/प्र. क्र. ११/र-५, दि. ०७/०६/२०२४.
४. शासन शुध्दीपत्रक, महसूल व वन विभाग (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन), क्रमांक-कोभूपु-३१२३/ प्र. क्र. ११/र-५, दि. २६/११/२०२४.
५. जिल्हाधिकारी, सातारा यांचे पत्र क्र. जिनिस/को.भू.पु.नि.स./निधी मागणी/कार्या-६/१६२५, दि. १०/१०/२०२४.
६. शासन निर्णय, महसूल व वन विभाग (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन), क्रमांक-कोभूपु-३१२४/प्र. क्र. ९१/र-५, दि. ०८/१०/२०२४.
७. जिल्हाधिकारी, सातारा यांचे पत्र क्र. जिनिस/को.भू.पु.नि.स./निधी मागणी/कार्या-६/२६१, दि. ११/०२/२०२५.

**प्रस्तावना :-**

मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अध्यक्षतेखाली "कोयना भूकंप पुनर्वसन निधी समिती" कार्यरत असून सन २०२४-२५ करीता नवीन कामाच्या मंजूरीसाठी मंजूर निधी तालुकानिहाय टक्केवारी प्रमाणे वाटपाची मंजुरी देण्यात आलेली आहे. त्या अनुषंगाने निधी तालुकानिहाय टक्केवारी प्रमाणे वाटपाची मंजुरी देण्यात आलेली आहे. त्या अनुषंगाने तालुका कराड उत्तर करीता निधीच्या ७% निश्चित करण्यात आली आहे त्यानुसार कराड उत्तर तालुक्यातील विकास कामांकरीता दिलेल्या संदर्भाधीन क्र. ६ अन्वये दिलेल्या प्रशासकीय मान्यतेनुसार निधी देण्याची बाब
शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

"कोयना भूकंप पुनर्वसन निधी समिती" साठी महाराष्ट्र राज्याच्या अर्थसंकल्पातून तरतूद करुन व राज्य शासनाकडून समितीस मिळणारा निधी हा इतर कुठल्याही कामांवर खर्च न करता कोयना भूकंपप्रवण क्षेत्रामध्ये येणा-या ८ तालुक्यांच्या (पाटण, कराड (उत्तर), कराड (दक्षिण), जावळी, सातारा, महाबळेश्वर, संगमेश्वर व चिपळूण) दुर्गम भागात वसलेल्या खेडयांच्या विकासासाठी "कोयना भूकंप पुनर्वसन निधी समिती" यांच्या नियमाप्रमाणे केवळ कोयना भूकंप पुनर्वसन निधी समितीकरीताच खर्च करण्याच्या प्रयोजनाकरिता जिल्हाधिकारी, सातारा यांना निधी वितरीत करण्यासाठी कराड उत्तर तालुक्यातील विकास कामांची संख्या एकूण ६५ असून कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद बांधकाम (पश्चिम) विभाग, सातारा यांच्या कार्यालयाकडून एकूण ६५ कामांना तांत्रिक मान्यता देण्यात आली आहे. ६५ कामांची तांत्रिक मान्यतेची रक्कम रु. ६,००,००,०००/- (रुपये सहा कोटी फक्त) इतकी आहे. त्यानुसार शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार मंजूर अनुदानातून कराड उत्तर तालुक्यातील सोबत जोडलेल्या परिशिष्ठ-अ मध्ये नमुदनुसार संदर्भाधीन क्र. ६ नुसार प्रशासकीय मान्यता दिलेल्या विकास कामांना कोयना भूकंप पुनर्वसन निधी समितीच्या

नियमानुसार मागणी क्र. सी-०५ मुख्यलेखाशीर्ष २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०१-पुनर्वसन, २०२-इतर पुनर्वसन योजना (०७)(०१) कोयना भूकंप पुनर्वसन निधी समिती (अनिवार्य) (दत्तमत) (२२३५ डी५५१) ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली प्रथमत: ५०% रक्कम रु. ३,००,००,०००/-(रुपये तीन कोटी फक्त) इतका निधी जिल्हाधिकारी, सातारा यांना पुढील परिच्छेद क्र. ३ मध्ये नमूद अटी/शर्तीच्या अधीन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. संबधीत कार्यान्वित यंत्रणेच्या कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पश्चिम) विभाग, सातारा यांनी सोबत जोडलेल्या परिशिष्ठ-अ च्या यादीनुसार सुरु करण्यात आलेल्या विकास कामांच्या प्रगतीच्या अहवाल/खर्चाच्या प्रगतीच्या अहवाल इ. सादर करुन कामाच्या प्रगतीनुसार सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाच्या कालावधीत सदर कामे पूर्ण करण्याच्या नियोजनानुसार खर्च मागणी क्र. सी-०५ मुख्यलेखाशीर्ष २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०१-पुनर्वसन, २०२-इतर पुनर्वसन योजना (०७)(०१) कोयना भूकंप पुनर्वसन निधी समिती (अनिवार्य) (दत्तमत) (२२३५ डी५५१) ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली आवश्यक मागणी शासनास सादर करावी. त्यानुषंगाने मंजूर व उपलब्ध तरतुदीतून आवश्यक तेवढा निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करण्यात येईल. सदरच्या विकास कामांसाठी वितरीत करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने प्रलंबित उपयोगिता प्रमाणपत्रे (Utilization Certificate) प्राधन्याने सादर करावीत.

३. समितीच्या अंतर्गत कामाच्या अंमलबजावणीसाठी समितीच्या कार्यकारिणीने दिनांक २९.०७.२०१३ रोजीच्या बैठकीत पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे. "शासकीय नियमांचे व पध्दतीचा अवलंब करुन सदर विविध कामाच्या अंमलबजावणीसाठी जिल्हाधिकाऱ्यांना प्राधिकृत करण्याचा निर्णय घेण्यात आला. जिल्हाधिकाऱ्याने नेमलेल्या शासकीय यंत्रणेने देखील शासकीय नियम पाळून कामाची पूर्तता करावी.

४. समितीद्वारे मजूर कामांना प्रथमत: ५०% रक्कम प्रदान केली जाते. संबंधित यंत्रणेकडून सदर रकमेच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्यानंतर उर्वरित ५०% रक्कम प्रदान करण्यात येते.

५. **सदर निधी खर्च करताना सर्व संबंधितांनी खालील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे.**

१) सदर निधी वितरणासाठी सह सचिव/उपसचिव तथा सचिव, कोयना भूकंप पुनर्वसन निधी समिती यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांनी सदर निधी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पश्चिम) विभाग, सातारा यांना BEAMS प्रणालीवर उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही करावी.

२) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पश्चिम) विभाग, सातारा यांनी या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तद्नुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, जिल्हाधिकारी, सातारा यांना सत्वर सादर करावा.

३) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

४) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी .

५) सदरच्या आदेशातील नमूद लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक राहणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित यंत्रणेचे कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

६) सदरच्या आदेशातील नमूद लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही, याची संबंधित यंत्रणेचे कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

७) सदरच्या आदेशातील नमूद लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियंत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

८) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधी संबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconciliation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

९) संबंधित अधीक्षक अभियंता व संबंधित कार्यकारी अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilisation Certificate) पुढील निधी मागणी प्रस्तावासोबत शासनास सादर करावे. तसेच सदर उपयोगिता प्रमाणपत्र (Utilisation Certificate) महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी यांनाही सादर करावे.

१०) या संदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०२४-२०२५ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

६. सदर आदेश वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/१३/विनिमय, भाग-२, दिनांक दिनांक १७ एप्रिल २०१५ मधील वित्तीय नियमावली भाग पहिला उपविभाग तीन परिच्छेद क्र. २७(२) अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार व वित्त विभाग अनौ. संदर्भ क्र. २७/२०२५/व्यय-१०, दिनांक २१ जानेवारी, २०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०३२५११५०४५५३१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ

Digitally signed by SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=559498df564ab1121a356349085c1b8e3cc0f12569ba0f7f2090386d4dccb333, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F7145AF5949FB706E2DCB06C2B209B58FFA369F6E085E02041722C90F0528791, cn=SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
Date: 2025.03.25 11:51:39 +05'30'

**(सत्यनारायण बजाज)**
उप सचिव, तथा सचिव,
कोयना भूकंप पुनर्वसन निधी समिती

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव.
३) मा. मंत्री (राज्य उत्पादन शुल्क) यांचे खाजगी सचिव
४) मा. मंत्री/राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव
५) मा. अप्पर मुख्य सचिव (मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहाय्यक
६) महालेखापाल२/१- (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
७) संचालक, लेखा व कोषागरे
८) वित्तीय सल्लागार व सह सचिव, महसूल व वन विभाग(म. व पु.) मंत्रालय, मुंबई.
९) उपसचिव, कार्यासन र-५ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.-३२

१०) जिल्हाधिकारी, सातारा/रत्नागिरी.
११) वित्त विभाग(अर्थसंकल्प-६/व्यय-१०, वित्त आयोग कक्ष), मंत्रालय,मुंबई-३२,
१२) कार्यासन अधिकारी (ब-१/म-७/पीएसी कायासने) मंत्रालय, मुंबई-३२,
१३) निवडनस्ती (कार्यासन र-५)

## परिशिष्ठ-अ

**कराड उत्तर** तालुक्यातील सन २०२४-२५ मधील कामांना कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद बांधकाम विभाग (पश्चिम), सातारा यांनी दिलेल्या तांत्रिक मान्यतेचे प्राप्त प्रस्तावास प्रशासकिय मंजूरीचा तपशील.

| अ. क्र. | कामाचे नाव ( ता. कराड उत्तर, जि. सातारा) | तांत्रिक मान्यता दिनांक | एकूण प्रशासकिय मान्यतेची रक्कम | प्रशासकिय मान्यतेसह ५०% निधीवितरण रक्कम (पहिला हप्ता) |
|---|---|---|---|---|
| १. | वराडे येथे सिध्दार्थ फुके यांच्या घरापासून ते गुलाबराव इंगळे यांच्या घरापर्यंतचा रस्ता काँक्रीटीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| २. | उंब्रज येथे भिमसेन महाराज दिल्ली दरवाजा ते समर्थ स्थापीत मारूती मंदिर ते जुने पोस्ट ऑफिस पर्यंतचा रस्ता काँक्रीटीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ३. | वडगांव (उंब्रज) येथील ग्रामपंचायत परिसराला वॉल कंपाऊंड बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ४. | साबळवाडी येथे स्मशानभूमीमध्ये वेटींग शेड बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ५. | कोपर्डे हवेली येथे श्री. बबन यशवंत चव्हाण यांचे घरापासून ते श्री. संजय शिवाजी चव्हाण यांच्या घरापर्यंतचा रस्ता काँक्रीटीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ६. | पेरले येथील कदम मळावस्ती येथे स्मशानभूमी बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ७. | मसूर येथे चावडी चौक ते बाजारपेठ पर्यंतचा रस्ता काँक्रीटीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ८. | करवडी येथे बौध्द वस्तीमध्ये लक्ष्मी देवी मंदिरासमोर सामाजिक सभागृह बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ९. | उत्तर कोपर्डे येथील श्री. हनुमान मंदिरासमोर सामाजिक सभागृह बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| १०. | तासवडे येथील अंगणवाडी ते विशाल खरात यांच्या घरापर्यंतचा रस्ता काँक्रीटीकरण करणे व बंदिस्त आर.सी.सी. गटर बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ११. | निगडी येथील मागासवर्गीय वसाहतीमध्ये व्यायामशाळा इमारत बांधणे व व्यायाम साहित्य बसविणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| १२. | शिरवडे येथील शिवाजी नथुराम जगदाळे यांच्या घरापासून ते किसन जोतिराम जगदाळे यांच्या घरापर्यंतचा रस्ता काँक्रीटीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| १३. | शिवडे येथील मराठी शाळेपाठीमागून ते जांभळे गिरणीपर्यंत जाणारा पोहोच रस्ता खडीकरण व डांबरीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| १४. | हनुमानवाडी येथील दत्त मंदिर ते शंकर निवृत्ती नलवडे यांच्या घरापर्यंतचा रस्ता खडीकरण व डांबरीकरण करणे व रस्त्याच्या पश्चिम बाजूने आर.सी.सी.गटर बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| १५. | भोसलेवाडी येथील श्री. हणमंत महादेव भोसले ते श्री. संतोष यशवंत भोसले यांच्या घरापासून व श्री.अशोक रामचंद्र पवार ते श्री. गोरख पंचम भोसले यांचे घरापर्यंतचा रस्ता काँक्रीटीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| १६. | हजारमाची (सदाशिवगड) येथे लिंगायत स्मशानभूमीमध्ये अंत्यविधी शेड व निवारा शेड बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| १७. | उंब्रज येथे भैरोबा मंदिर ते सुतार यांच्या घरापर्यंतचा रस्ता काँक्रीटीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १८. | मेरवेवाडी येथे आर.सी.सी. गटर बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| १९. | वडोली निळेश्वर येथे ग्रामपंचायत ते डुबलवाडा पाठीमागुन सोसायटी पर्यंतचा रस्ता काँक्रीटीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| २०. | किवळ येथील महादेव मंदिरासमोरील सामाजिक सभागृहाचे उर्वरीत काम करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| २१. | कोणेगांव येथील तालीम गृह ते निवृत्ती गुजले (गुरूजी) यांच्या घरापर्यतचा उर्वरीत रस्ता काँक्रीटीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| २२. | कोपर्डे हवेली येथील महादेव मंदिरासमोरील सामाजिक सभागृह बंदिस्त करणे. | ०९/१०/२०२४ | ५,००,०००/- | २,५०,०००/- |
| २३. | कोरीवळे येथील अंतर्गत रस्ते खडीकरण व डांबरीकरण करणे. | | | |
| २४ | हेळगांव येथे विठ्ठल मंदिराशेजारील खुल्या जागेत बंदिस्त सभामंडप बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| २५ | आदर्शनगर येथे स्मशानभूमीस संरक्षक भिंत बांधणे व स्मशानभूमीची दुरूस्ती करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| २६. | उंब्रज येथील भैरोबा मंदिर ते शेजवळ गल्ली पर्यंतचा रस्ता काँक्रीटीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| २७ | डफळवाडी येथे शवदाहिनी व वेटींग शेड बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| २८. | शितळवाडी येथे भैरवनाथ मंदिराभोवती संरक्षक भिंत बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| २९. | ओगलेवाडी येथे मुस्लीम समाजाच्या स्मशानभूमीस संरक्षक भिंत बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ३०. | पिंपरी येथील नारायण गणपती वांगडे यांच्या घरापासून ते जगदेव येवले यांच्या घरापर्यंतचा रस्ता खडीकरण, डांबरीकरण करणे व बंदिस्त आर.सी.सी. गटर बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ३१. | खोडजाईवाडी येथे खोडजाईमाता मंदिरासमोरील जागेत काँक्रीटीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ३२. | वडोली भिकेश्वर येथे महादेव मंदिरासमोर सामाजिक सभागृह बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ३३. | कळंत्रेवाडी येथे धिरज थोरात यांच्या घरापासून ते पाण्याच्या टाकी पर्यंतचा रस्ता खडीकरण डांबरीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ३४ | चरेगांव येथे मागासवर्गीय सामाजिक सभागृहाची दुरूस्ती व सुशोभिकरण करणे. | ०९/१०/२०२४ | ६,००,०००/- | ३,००,०००/- |
| ३५. | कोर्टी येथील सिध्देश्वर मंदिर परिसर सुशोभिकरण करणे. | ०९/१०/२०२४ | ३,००,०००/- | १,५०,०००/- |
| ३६. | पेरले येथील श्री.गणेश, दत्त मंदिर व श्री.हनुमान मंदिरासमोरील सभागृहाचे सुशोभिकरण करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ३७ | यादववाडी येथील जोतीराम भगवान यादव यांचे घरापासून ते सिंधुताई बाळासो देसाई यांचे घरापर्यंतचा रस्ता खडीकरण डांबरीकरण करणे व छोटे सी.डी.वर्क बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ३८. | माळवाडी येथे सामाजिक सभागृह बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ३९. | शिरगांव अंतर्गत हुडीवस्ती ते पाल जाणारा महिपती रामचंद्र यादव यांच्या शेतघरापर्यंतचा रस्ता खडीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | ८,००,०००/- | ४,००,०००/- |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ४० | कोरेगांव येथे रा.मा १४२ ते देसाईमळाकडे जाणारा रस्ता सुधारणा करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ४१. | टेंभू येथे टेंभू ते कोरेगांव हद्दीवरील रस्ता रा.मा. १४२ ते कॅनॉल पर्यंतचा रस्ता सुधारणा करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ४२ | इंदोली येथील आशा पोकळे यांच्या घरापासून ते दवाखान्यापर्यंतचा रस्ता कॉंक्रीटीकरण करणे (२३० फूट लांबी). | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ४३ | शिरवडे येथे दादासो आप्पा पवार यांच्या घरापासून ते रामचंद्र यशवंत जगदाळे यांच्या घरापर्यंतचा रस्ता खडीकरण व डांबरीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | ५,००,०००/- | २,५०,०००/- |
| ४४ | शिवाजीनगर (मांगवाडी) येथे ग्रामपंचायत इमारतीच्या वरती अभ्यासिका हॉल बांधणे. | | | |
| ४५ | बनवडी गजानन सरस्वती कॉलनीमध्ये स्वामी समर्थ महाराज मंदिरासमारे सामाजिक सभागृह बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ४६ | डफळवाडी येथे प्राथमिक शाळा ते लक्ष्मी मंदिरापर्यंतचा (४०० मीटर) रस्ता कॉंक्रीटीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ४७ | इंदोली येथील प्रकाश जाधव यांच्या घरापासून ते बाळू वाघ यांच्या घरापर्यंतचा रस्ता कॉंक्रीटीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ४८ | पाडळी (हे.) येथे प्राथमिक शाळेला संरक्षक भिंत बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ४९ | उंब्रज येथे श्री.जानाईदेवी मंदिरासमोर सभामंडप बांधणे. | ०९/१०/२०२४ | ५,००,०००/- | २,५०,०००/- |
| ५०. | पाल येथे पाल पेंबर मधील खंडोबा मंदिरा शेजारील ओढ्याकाठी संरक्षक भिंत बांधणे. | | | |
| ५१. | वाण्याचीवाडी येथे ग्रामपंचायत इमारतीवरती सामाजिक सभागृह बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ५२ | सैदापूर येथील आर्मी निवासकडे जाणारा रस्ता कॉंक्रीटीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ५३. | उत्तर कोपर्डे (दत्तनगर) येथे श्री.एकनाथ गणपती चव्हाण यांचे घरापासून ते श्री.संभाजी ज्ञानू चव्हाण यांचे घरापर्यंतच्या रस्त्याच्या कडेला आर.सी.सी. बंदिस्त गटर बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ५४ | गोसावेवाडी येथील अंतर्गत रस्ते कॉंक्रीटीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ५५ | अंतवडी येथील शहीद स्मारक सुशोभिकरण करणे. | ०९/१०/२०२४ | ५,००,०००/- | २,५०,०००/- |
| ५६ | बानुगडेवाडी येथील मुस्लीम समाज दर्गामध्ये कॉंक्रीटीकरण करणे. | | | |
| ५७ | भवानवाडी येथील ग्रामपंचायत कार्यालय ते दिलीप यादव यांच्या घरापर्यंतचा रस्ता कॉंक्रीटीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | ५,००,०००/- | २,५०,०००/- |
| ५८ | चिंचणी येथे अंतर्गत रस्ते खडीकरण व डांबरीकरण करणे. | | | |
| ५९ | कामथी येथे तालीमगृह बांधणे. | ०९/१०/२०२४ | ७,००,०००/- | ३,५०,०००/- |
| ६० | कालगांव येथे शादीखाना बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ६१ | हजारमाची येथे वार्ड क्र.३ मधील सुर्वे चाळ येथील जगन्नाथ सुर्वे यांचे घर ते रामचंद्र सुर्वे यांच्या घरापर्यंतचा रस्ता कॉंक्रीटीकरण करणे व आर.सी.सी. गटर बांधणे. | ०९/१०/२०२४ | ७,००,०००/- | ३,५०,०००/- |
| ६२ | कांबीरवाडी येथील स्मशानभूमीमध्ये दुरूस्ती करणे, पेव्हर ब्लॉक बसवणे व संरक्षक भिंत बांधणे. | ०९/१०/२०२४ | ७,००,०००/- | ३,५०,०००/- |
| ६३ | उंब्रज येथे भिम-कुंती प्रांगणात सभामंडप बांधणे. | ०९/१०/२०२४ | ७,००,०००/- | ३,५०,०००/- |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ६४ | चोरे येथे गावअंतर्गत बंदिस्त आर.सी.सी.गटर बांधणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| ६५ | हरपळवाडी येथे अंतर्गत रस्ते कॉंक्रीटीकरण करणे. | ०९/१०/२०२४ | १०,००,०००/- | ५,००,०००/- |
| | | **एकूण** | **६,००,००,०००/-** | **३,००,००,०००/-** |

SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ

Digitally signed by SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=559498df564ab1121a356349085c1b8e3cc0f12569ba0f7f20 90386d4dccb333, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F7145AF5949FB706E2DCB06C2B209B58FFA369F6E08 5E02041722C90F0528791, cn=SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
Date: 2025.03.25 11:52:05 +05'30'

**( सत्यनारायण बजाज )**
उपसचिव तथा न्यासाचे सचिव,
कोयना भूकंप पुनर्वसन निधी समिती.